**सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात विभागीय संदर्भ सेवा रूग्णालय, अमरावती करीता** Inj. Centhaquine Citrate 1.0 mg **या औषधीच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा -१२२४/प्र.क्र.४१/आरोग्य-८

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १२ जून, २०२४

**वाचा :-**

(१) सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-४/ नस्ती क्र.१९/विसंसेरु अमरावती नाशिक /Inj. Centhaquine Citrate १.०mg/२०२४/२९२१-२३, दि.२८.०२.२०२४.

(२) सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-४/ पुरकमागणी/२२५१०४२५९/Inj. Centhaquine Citrate १.०mg/१११२६-२८,दि.१०.०५.२०२४

(३) शासनपत्र, क्र. एसडीएल२०१९/प्र.क्र.१८१/आरोग्य-८,दि.२९.१२.२०२३

**प्रस्तावना:-**

विभागीय संदर्भ सेवा रूग्णालय, अमरावती व नाशिक या कार्यालयांनी IUC मधील अत्यावश्यक असलेली Inj. Centhaquine Citrate १.० mg ही Emergency Medicine असल्याने, सदर औषधीची ५०० इतक्या संख्येमध्ये पुरवठा करणेबाबत मागणी नोंदविलेली आहे. सदर औषधीचा अतिदक्षता विभागातील वापर, गुणवत्तेबाबत तज्ञ समितीने दिलेल्या अभिप्रायानुसार Inj. Centhaquine Citrate १.० mg या औषधाचा SDL (राज्य औषधी साहित्य सूची) मध्ये समावेश करण्यास शासन पत्र दिनांक २९ डिसेंबर, २०२३ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार विभागीय संदर्भ सेवा रूग्णालयांनी केलेल्या मागणीनुसार सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये Inj. Centhaquine Citrate १.० mg ही औषधी खरेदी करण्याकरीता आरोग्य सेवा आयुक्तालयाने संदर्भीय पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावा नुसार, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात विभागीय संदर्भ सेवा रूग्णालय, अमरावती या रुग्णालया करीता Inj. Centhaquine Citrate १.० mg ही औषधी खरेदी करण्याच्या रु.४९,२५,०००/- (अक्षरी रुपये एकोणपन्नास लक्ष पंचवीस हजार फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास परिच्छेद क्र.०३ खालील नमुद केलेल्या अटींच्या अधिन राहुन प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर खरेदीसाठीचे विवरणपत्र पुढीलप्रमाणे आहे.

## विवरणपत्र-अ
## अनुदानाचा तपशिल

| लेखाशिर्ष | खरेदीचा तपशिल | प्रशासकीय मान्यतेची रक्कम | उपलब्ध निधी |
|---|---|---|---|
| मागणी क्र.३<br>२२१०, वैद्यकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०९) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, (०९) (०१) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणामार्फत औषधे, औषधी साहित्य, यंत्रसामग्री व साधन सामग्री खरेदी (अनिवार्य)<br>३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)<br>(२२१० के ०७९) | Inj. Centhaquine Citrate १.० mg | रु.४९,२५,०००/-<br>- | सन २०२४-२५ मधील अर्थसंकल्पीय / पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध होणारी तरतूद |

## विवरणपत्र-ब
## खरेदीचा तपशिल

| अ.क्र | रुग्णालयाचे नाव | खरेदीचा तपशील | अंदाजित दर | मंजूर संख्या | खर्चाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती | Inj. Centhaquine Citrate १.० mg | रु.९८५०/- | ५०० | रु.४९,२५,०००/- |

२. सदर प्रस्तावासंदर्भात आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी संबंधित उत्पादकाने दिनांक ०९.०४.२०२४ रोजीच्या पत्रान्वये Inj. Centhaquine Citrate १.० mg हे त्यांच्या कंपनीच्या मालकीचे औषध असल्याचे एकलस्त्रोत प्रमाणपत्र (Proprietary Article Certificate) व Patent Certificate (Patent Number २८२१५५) प्रस्तावासोबत सादर केले आहे. त्यानुसार मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकिय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई यांनी In. Centhaquine Citrate या औषधीची उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय दिनांक ०१/१२/२०१६ मधील परिच्छेद क्र. ३.२.६ "एकलस्त्रोत पद्धतीने" थेट स्वरूपात खरेदी करण्याची कार्यवाही करावी

३. आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकिय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई यांनी सदरहू औषधी खरेदी प्रक्रिया/ विनियोग करताना पुढील अटी/शर्तीचे अनुपालन करावे.

(१) सदरहू औषधाची आवश्यकता व मागणी याची शहानिशा /खातरजमा करण्यात आल्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

(२) सदरहू औषधाचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical

specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल, अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात आल्यानंतरच सदर बाबींची खरेदी प्रक्रिया करण्यात यावी.

(३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकिय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई यांनी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित पध्दतीने खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी. तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

(४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

(५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post-dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

(६) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

(७) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची संबंधित वैद्यकीय अधिक्षक यांनी दक्षता घेण्यात यावी.

(८) सदरची खरेदी प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी. सदरहू खरेदीच्या अनुषंगाने निविदा प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा तपशील मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकिय वस्तु खरेदी प्राधिकरण, मुंबई यांनी शासनास सादर करावा.

(९) या कामी होणारा खर्च, "**मागणी क्र.३, २२१०, वैद्यकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०९) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, (०९) (०१) महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरणामार्फत औषधे, औषधी साहित्य, यंत्रसामग्री व साधन सामग्री खरेदी (अनिवार्य) ३१ - सहाय्यक अनुदाने वेतनेतर (२२१० के ०७९)**" या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या/

पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतुन भागविण्यात येऊन तो सदरहू लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

(१०) उपरोक्त अनुक्रमांक १ ते ०९ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी, आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई, मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई व सहसंचालक आरोग्य सेवा (रुग्णालये- राज्यस्तर), मुंबई यांची राहील.

४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६०५१२१९२५९५१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHANDRAKANT HARIDAS WADE

Digitally signed by CHANDRAKANT HARIDAS WADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9474E7143B2BC3FD96E8D7BF07D1CE51DE8461D4C34AE1E3F643C11B54523936, cn=CHANDRAKANT HARIDAS WADE
Date: 2024.06.12 17:27:04 +05'30'

**(चंद्रकांत ह. वडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी , महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक, आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
६) सह संचालक, आरोग्य सेवा, (कुष्ठ व क्षयरोग) , पुणे-६.
७) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
८) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई.
९) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर.
१०) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
१२) निवडनस्ती (आरोग्य-८)